महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मधील अधिकाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मध्ये तात्पुरती पदोन्नती.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्रमांक : मविसे-१०१६/प्र.क्र.२०३/२०१६/आस्था-३,

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ११ जानेवारी, २०१७.

**संदर्भ :-**

१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक २८.०४.२०१५

२) शासन अधिसूचना,सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवेतील सहायक गट विकास अधिकारी गट-ब मधील अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी गट-अ या संवर्गात पीबी-३ वेतनश्रेणी रुपये १५६००-३९१०० ग्रेडवेतन ५४०० या वेतनश्रेणीत या आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

तद्नुषंगाने शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-२०१५/ प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक २८.०४.२०१५ आणि शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१५ /प्र.क्र.१५६/का.१२, दिनांक १६.७.२०१५ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहीत केलेल्या महसुली विभाग वाटप नियम, २०१५ मधील तरतूदींच्या अधीन नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी तसेच शासनाच्या मान्यतेने सदर अधिकाऱ्यांना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी तदर्थ पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्याचे पदनाम व ठिकाण | तदर्थ पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.एन.आर. जाधव,<br>सहायक गट विकास अधिकारी,<br>पंचायत समिती परांडा,<br>जि.उस्मानाबाद | गट विकास अधिकारी,<br>पंचायत समिती, अहमदपूर<br>जिल्हा लातूर | रिक्त पदावर |

२. श्री.एन.आर. जाधव यांना देण्यात आलेली तात्पुरती पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

अ) पदोन्नतीच्या कोटयातील पदावर देण्यात येत असलेली सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपाची असून, ती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

ब) सदर पदोन्नती शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक : एसआरव्ही-१०८७/ २००/प्र.क्र.३/८७/ १२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतुदीच्या अधीन राहील.

क) सदर तात्पुरती पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आलेली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

ड) सदर तात्पुरती पदोन्नती ही आरक्षणासंदर्भात मा.उच्च न्यायालयात प्रलंबित असणाऱ्या याचिका क्र.८४५२/२००४ मधील T.A. १/२०१४ आणि T.A. २/२०१४ च्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

इ) सदर तात्पुरती पदोन्नती ही त्यांच्या वयाच्या ५०/५५ व्या वर्षानंतर पुनर्विलोकन करावयाच्या शासन निर्णयाच्या अधीन राहील.

३. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती देण्यात आलेल्या श्री.एन.आर. जाधव यांनी त्यांच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको असे समजून, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: एसआरव्ही-१०८७/११३१/प्र.क्र.११/८९/१२, दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांच्या केलेल्या निवडीने नियुक्त्या रद्द करण्यात येतील.

४. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन, श्री.एन.आर. जाधव यांना तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत सूचना द्याव्यात. तसेच श्री.जाधव यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

५. तात्पुरत्या पदोन्नतीने नियुक्ती दिलेल्या श्री.एन.आर. जाधव यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. तसेच, त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर-१०८२/२५६७/२८/११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये

दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास श्री.जाधव शिस्तभंगाच्या कारवाई पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०७१०५९४२०५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijay Dattatraya Shinde

Digitally signed by Vijay Dattatraya Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fabf0ce38fdf553beb949764920592a97832b6399cb7060200d032e127e455f1, cn=Vijay Dattatraya Shinde
Date: 2017.01.11 14:44:19 +05'30'

( वि.द. शिंदे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री ( ग्राम विकास ) यांचे खाजगी सचिव
३. मा.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
४. मा. सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
५. विभागीय आयुक्त, औरंगाबाद
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद / लातूर.
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी जिल्हा परिषद, उस्मानाबाद / लातूर.
८. महालेखापाल- २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, उस्मानाबाद / लातूर.
१०.श्री.एन.आर. जाधव, सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती परांडा, जि.उस्मानाबाद (मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद यांच्यामार्फत)
११.सामान्य प्रशासन विभाग, (कार्यासन-१२/कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई
१२.कार्यासन क्रमांक आस्था-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३.कार्यासन क्रमांक आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१४.निवड नस्ती, का.क्र. आस्था-३, ग्राम विकास व जलसंधारण विभाग